नांदेड जिल्हा परिषदेतील पाणी पुरवठा योजनेवरील रोजंदारी कर्मचाऱ्यांना वेतन व भत्त्यांसाठी अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जिपग्रा-१२१८/प्र.क्र.३३५/पापु-२३

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: ९ मार्च, २०२०.

**वाचा :-**

१) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्रमांकः २६१७/२००८ मधील मा.उच्च न्यायालयाचे आदेश दिनांक ०८/०५/२०१८.
२) जिल्हा परिषद नांदेड यांचे पत्र क्र.जिपना/ग्रापापुवि/आ-२/२६२५/२०१८, दिनांक १६/११/२०१८
३) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२५१७/प्र.क्र.१४८ (भाग-२)/ आस्था-१०, दिनांक ०६/०३/२०१९.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२/०१/२०२०
५) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासनपत्र क्रमांकः जिपग्रा १२१८/प्र.क्र.३३५/पापु-२३, दिनांक ०६/०३/२०२०.

**प्रस्तावना :-**

नांदेड जिल्हा परिषदेच्या पाणी पुरवठा विभागामध्ये कार्यरत असलेल्या रोजंदारी कर्मचाऱ्यांना कालेलकर निवाड्याचे फायदे लागू करण्याचे आदेश मा. औद्योगिक न्यायालयाने तक्रार क्रमांक ०४/२००५ मध्ये दिनांक २१/०६/२०७ रोजी दिले आहेत. या निर्णयाची पूर्तता करण्यासाठी जिल्हा परिषदेकडे निधी उपलब्ध नसल्याचे नमूद करून जिल्हा परिषद, नांदेड यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र २६१७/२००८ दाखल केली होती.

मा.उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२६१७/२००८ मध्ये दि.८/५/२०१८ रोजी आदेश देताना नांदेड जिल्हा परिषदेच्या पाणी पुरवठा विभागामध्ये कार्यरत असलेल्या रोजंदारी

कर्मचाऱ्यांना कालेलकर निवाडयाचे फायदे लागू करणेसंदर्भात मा.औदयोगिक न्यायालयाचे आदेश कायम केले असून अशा कर्मचाऱ्यांच्या वेतन/भत्त्यासाठी अनुदान देण्याची शासनाची वैधानिक जबाबदारी असल्याचे अन्य न्यायालयीन प्रकरणामध्ये (रिट याचिका क्र २८८३/१९९२) मा. उच्च न्यायालयाने दि.१९/१/२००५ च्या आदेशान्वये स्पष्ट केले आहे. त्यानुसार प्रस्तुत प्रकरणामध्ये संबंधीत कर्मचाऱ्यांच्या थकबाकी/वेतनाचा प्रश्न हाताळण्याबाबत सुचीत केले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या या आदेशाची अंमलबजावणी न झाल्यामुळे याचिकाकर्त्यांनी मा. उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठ येथे अवमान याचिका क्र ७५०/२०१८ दाखल केली आहे.

प्रस्तुत प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.८/५/२०१८ रोजी दिलेल्या आदेशानुसार नांदेड जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवरील मा.उच्च न्यायालय निर्देशित ग्रामीण पाणी पुरवठा योजनेवरील रोजंदारी/रुपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवरील (CRTE) कर्मचाऱ्यांच्या थकबाकीची आणि वेतन भत्त्यांची रक्कम अदा करणेसाठी कालेलकर कराराच्या तरतूदींच्या अधीन राहून शासनस्तरावरून अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता नांदेड जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवरील मा. उच्च न्यायालय निर्देशित ग्रामीण पाणी पुरवठा योजनांवरील रोजंदारी/रुपांतरीत नियमित अस्थायी आस्थापनेवरील (CRTE) कर्मचाऱ्यांच्या थकबाकीची आणि वेतन भत्त्यांची रक्कम अदा करणेसाठी नांदेड जिल्हा परिषदेला अनुदान म्हणून लेखाशिर्ष २२१५१९१४ या लेखाशिर्षांतर्गत रक्कम रू.२,०४,६३,३७९/- (अक्षरी रूपये दोन कोटी, चार लक्ष, त्रेसष्ठ हजार, तीनशे एकोणऐंशी फक्त) या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे-

१) मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०८/०५/२०१८ रोजीच्या निर्णयानुसार तसेच वाचा मधील अनुक्रमांक (५) येथील शासन पत्रातील अटी व शर्ती यानुसार तपासणी करुन पुढील कार्यवाही करण्यात यावी.

२) मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०८/०५/२०१८ रोजीच्या निर्णयानुसार, तपासणीच्या अटींच्या अधीन राहून, निर्णयाच्या अंमलबजावणीच्या मर्यादेत त्यातील कर्मचाऱ्यांसाठीच फक्त **"विशेष बाब"** म्हणून निधी वितरीत करण्यास सहमती देण्यात

येत आहे. सदर निर्णय पुर्वोदाहरण म्हणून इतर कोणत्याही जिल्हा परिषदेला लागू होणार नाही.

३) मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०८/०५/२०१८ च्या आदेशानुसार निर्माण करण्यात येणारी पदे ही कालेलकर करारातील तरतूदींनुसार रिक्त झाल्यावर व्यपगत होतील.

०२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करून घेण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांना 'नियंत्रक अधिकारी' तर कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०३. सदर रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना कर्मचारी-निहाय वितरीत रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

०४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येणारा खर्च मागणी क्रमांक “वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१), जिल्हा परिषद/ पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना- आस्थापना अनुदाने (०१) (०७) नियमित आस्थापनेवरील रोजंदारीवर काम करणारा कर्मचारी वर्ग (अनिवार्य) (२२१५१९१४), ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

०५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२/०१/२०२० अन्वये नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ०९/व्यय-३, दिनांक १०/०१/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०९१९३१५७३७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.03.09 20:08:56 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड, नांदेड.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
६. अधिदान व लेखाधिकारी, नांदेड.
७. उपसचिव, वित्त विभाग, कार्यासन व्यय-३/ अर्थसंकल्प-१८, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती, कार्यासन, पापु-२३